**सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन योजनेच्या कामासाठी विभागीय व उपविभागीय कार्यालये उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१८/प्र.क्र.१०८/२०१८/आ.(प्रशि.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०१८.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८.३.१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२.
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. आढावा-१००२/३३५/२००२/आ(प्रशि), दिनांक ६/२/२००३

**प्रस्तावना -**

सुलवाडे-जामफळ-कनोली उपसा सिंचन योजनेंतर्गत धुळे व शिंदखेडा या तालुक्यातील भुसंपादन, कालव्यांचे सर्वेक्षण व सविस्तर लाभक्षेत्र सर्वेक्षण/ राईझींग मेन/ राईझींग मेन ४/ राईझींग मेन-४अ/ डी.सी.१ (सोनगीर)/ डी.सी.३, डी.सी.४ व डी.सी.५/ गुरुत्व नलिका-१, ३ व ४/ पंप हाऊस ५ असे मुख्यत्वे कामकाज असून सदर योजना शासनाच्या बळीराजा संजिवनी योजनेत समाविष्ट आहे. सदरची योजना ही सन २०२२ पर्यंत पूर्ण करावयाची असल्याने, प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने या योजनेच्या कामांसाठी धुळे जिल्ह्यात स्वतंत्र विभागीय कार्यालय उपविभागीय कार्यालयांच्या संनियंत्रणासह कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक अधिनस्त अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर अंतर्गतचे कार्यकारी अभियंता, कडवा कालवा विभाग, नाशिक हे विभागीय कार्यालय त्याअंतर्गतच्या ४ उपविभागीय कार्यालयांसह तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गतच्या अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे अंतर्गत सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन योजनेच्या कामासाठी अंतर्गतच्या मंजूर पदांसह परि.२ मध्ये दर्शविलेल्या रचनेनुसार खालील अटींच्या अधीन राहून कार्यान्वित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर विभाग व उपविभागीय कार्यालये शासकीय इमारतीच्या जागेत कार्यान्वित करण्यात यावीत. त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये.
२) स्थलांतरीत होणाऱ्या विभागीय व उपविभागीय कार्यालयातील मंजूर गट-अ व गट-ब या संवर्गातील कार्यरत अधिकाऱ्यांच्या सेवा स्थलांतरणाने कार्यान्वित होणाऱ्या विभागीय व उपविभागीय कार्यालयाच्या मुख्यालयी कार्यरत राहील.

३) तसेच स्थलांतरीत ठिकाणी कार्यान्वित होणाऱ्या कार्यालयातील मंजूर गट-क व गट-ड या संवर्गातील कर्मचाऱ्यांची सेवा स्थानिक परिमंडळ कार्यालयामार्फत उपलब्ध करुन घेण्यात यावी.

४) स्थलांतरीत होणाऱ्या विभाग व उपविभागीय कार्यालयांतर्गतचे सद्य:स्थितीत गट-क व गट-ड या संवर्गातील कार्यरत कर्मचाऱ्यांचे समावेशन संबंधित परिमंडळ कार्यालयाच्या कार्यकक्षेतील रिक्त जागी तात्काळ करावे.

५) वर्ग होणाऱ्या विभाग व उपविभागीय कार्यालयांकडील प्रकल्पिय कामे व त्याबाबतचा कार्यालयीन सर्व अभिलेख (न्यायालयीन, लेखा आक्षेप इतर प्रकरणे) प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने योग्य ठरेल अशा मंडळांतर्गतच्या अन्य विभाग व उपविभागीय कार्यालयांतर्गत हस्तांरित करण्याची कार्यवाही संबंधित प्रदेश / मंडळ कार्यालयामार्फत करण्यात यावी.

६) स्थलांतरणाने कार्यान्वित होणाऱ्या कार्यालयांसाठी सध्याच्या कार्यरत कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

२. उपरोक्त प्रमाणे सध्याच्या विभाग व उपविभागीय कार्यालयांच्या स्थलांतरणानंतर (बदलानंतरची) कार्यालयीन रचना खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | **गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अधिनस्त कार्यालयांची सध्याची रचना** | | **तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अधिनस्त संलग्न होणाऱ्या विभाग व उपविभागीय कार्यालयांची बदलानंतरची रचना** | | |
|---|---|---|---|---|---|
| | **प्रदेश व मंडळीय नियंत्रण** | **वर्ग होणाऱ्या कार्यालयांचे नांव** | **प्रदेश व मंडळीय नियंत्रण** | **बदलानंतरच्या कार्यालयांचे नांव** | **विवक्षित कामांचा तपशिल** |
| १ | मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक अंतर्गत अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर अंतर्गत → | **कडवा कालवा विभाग, नाशिक** | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, जळगांव अंतर्गत अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे अंतर्गत → | **सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन विभाग, धुळे** | सुलवाडे जामफळ कनोली या योजनेची व तद्नुषंगिक कामे |
| १.१ | | गौतमी गोदावरी मध्यम प्रकल्प उपविभाग, नाशिक | | सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन बांधकाम उपविभाग क्र.१ (सुलवाडे वसाहत), शिंदखेडा | वसाहत-भुसंपादन करणे, कालव्याचे सर्वेक्षण, राईझींग मेन डी.सी.१ सोनगीर, गुरुत्व नलिका-१ ची कामे |
| १.२ | | तिसगांव धरण उपविभाग, खेडगाव | | सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन बांधकाम उपविभाग क्र.२, धुळे | राईझींग मेन ४अ, डी.सी.III लाभक्षेत्र सविस्तर सर्वेक्षणाची कामे |
| १.३ | | कडवा कालवा उपविभाग क्र.१, सिन्नर | | सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन बांधकाम उपविभाग क्र.३, धुळे | राईझींग मेन ४ब, पंप हाऊस ५, डी.सी.४ ची कामे |
| १.४ | | पुणेगांव कालवा उपविभाग, ऊनंदानगर | | सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन बांधकाम उपविभाग क्र.४, धुळे | गुरुत्व नलिका ३ व ४ डी.सी. ५ ची कामे |

३. विभाग व उपविभागीय कार्यालयाच्या मंडळीय नियंत्रणात बदल होत असल्याने, या कार्यालयांसाठी वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दिनांक ८/३/१९८४ मधील तरतूदीनुसार अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे यांना नियंत्रक अधिकारी व कार्यकारी अभियंता, सुलवाडे जामफळ कनोली उपसा सिंचन विभाग, धुळे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. स्थलांतरीत / वर्ग होणारी विभाग व उपविभागीय कार्यालये तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव या कार्यालयाच्या नियंत्रणाखाली दि.१६.०७.२०१८ पर्यंत कार्यान्वित होईल या दृष्टीने आवश्यक ती सर्व कार्यवाही जळगांव महामंडळ कार्यालयांनी करावी.

विभागीय कार्यालयास आहरण व संवितरण क्रमांक प्राप्त होईपर्यंत विभागीय व संनियंत्रणाखालील उपविभागीय कार्यालयातील कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व वेतनेतर प्रयोजनावरील खर्च हा तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०६२८१८१९२८२९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.06.28 18:25:24 +05'30'

**( सु. गं. गांगरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधानसभा.
७. मा. विधान परिषद / विधानसभा सदस्य (सर्व).
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१३. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१४. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (DTHRS) मेरी, नाशिक.
१६. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१७. कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
१८. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१९. सह सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक.
२२. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, जळगांव.
२३. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२४. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२५. आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६. उप सचिव (सेवा) / उप सचिव (आस्था), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर.
२८. अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
२९. अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई प्रशासन मंडळ, मुंबई.
३०. कार्यकारी अभियंता, कडवा कालवा विभाग, नाशिक.
३१. उप अभियंता, गौतमी गोदावरी मध्यम प्रकल्प विभाग, नाशिक.
३२. उप अभियंता, तिसगांव धरण उपविभाग, खेडगाव.
३३. उप अभियंता, कडवा कालवा उपविभाग क्र.१, सिन्नर.
३४. उप अभियंता, पुणेगांव कालवा उपविभाग, ऊनंदानगर.
३५. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या मुख्यालय व विभागीय/उपविभागीय कार्यालयांच्या नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
३६. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३७. आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ / निवड नस्ती.